**“पूर्व द्रुतगती महामार्गावरील साखळी क्रमांक ५६६/६५० येथील अस्तित्वातील बॉक्स सेल कल्व्हर्टची पुनर्बांधणी व रुंदीकरण करणे”** या कामाच्या सु-सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस मंजूरी प्रदान करणेबाबत........

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - सुप्रमा -२०१४/प्र.क्र.५१/रस्ते-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ४ सप्टेंबर, २०१५

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्र. पीएलएन-१००९/सीआर-३१०/पी-३ मंत्रालय, मुंबई दि. २०/०५/२००९ अन्वये पूर्व द्रुतगती महामार्गावरील साखळी क्रमांक ५६६/६५० येथील अस्तित्वातील बॉक्स सेल कल्व्हर्टची पुनर्बांधणी व रुंदीकरण करणे या कामाच्या रु.१२,००,००,०००/- (रुपये बारा कोटी फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरच्या अंदाजपत्रकात १) पूलाचे रुंदीकरण करणे, २) पोचमार्ग, ३) सेवावाहिनी स्थलांतरीत करणे व ४) वाहतूक व्यवस्था या बाबीचा समावेश आहे.

शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१०/प्र.क्र.३४/रस्ते-५, मंत्रालय, मुंबई दि. २५/१०/२०१० अन्वये रू. २०,४४,७३,०००/- किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळाली असून कामाचा वाव पुढीलप्रमाणे आहे- १) पूलाचे रुंदीकरण करणे, २) पोचमार्ग, ३) सेवा स्थलांतर व ४) संकीर्ण बाबी

मुख्य अभियंता यांनी त्यांचे पत्र क्र. जा.क्र.मुअ(विप्र)/का-१/पु.द्रु.मा/सुप्रमा/१८३२/२०१४, दिनांक १८ नोव्हेंबर, २०१४ नुसार सदर कामासाठी लागणारा रु. २७,२६,१८,९८१/- इतक्या रकमेचा सु-सुधारित अंदाज सादर केला आहे. सदरच्या अंदाजपत्रकात १) पूलाचे रुंदीकरण करणे, २) पोचमार्ग, ३) सेवा स्थलांतर व ४) संकीर्ण बाबीचा समावेश आहे.

सदर कामाच्या रु. २७,२६,१८,९८१/- (रुपये सत्तावीस कोटी, सव्वीस लक्ष, अठरा हजार, नऊशे एक्याऐंशी फक्त) इतक्या सु-सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पूर्व द्रुतगती महामार्गावरील साखळी क्रमांक ५६६/६५० येथील अस्तित्वातील बॉक्स सेल कल्व्हर्टची पुनर्बांधणी व रुंदीकरण करणे या कामाच्या रु. २७,२६,१८,९८१/- (रुपये सत्तावीस कोटी, सव्वीस लक्ष, अठरा हजार, नऊशे एक्याऐंशी फक्त) इतक्या सु-सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. Before doing estimate and getting A.A. the department should obtain views / comments of utilities for any such future projects.

३. सदर शासन निर्णय व्यय अग्रक्रम समितीच्या दि.१२ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या बैठकीत प्रस्तुत प्रकरणी काम पूर्ण झाले असल्याने सदर प्रस्तावास मान्यता प्रदान केल्यानुसार, काढण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१५०९०४१४२७२६०३१८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laleetagouri Giribuwa

Digitally signed by Laleetagouri Giribuwa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Assistant Engineer GR-I, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laleetagouri Giribuwa
Date: 2015.09.04 14:34:12 +05'30'

**(ललितागौरी गिरीबुवा)**
सहाय्यक अभियंता-श्रेणी १ तथा
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) मुंबई
२) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
३) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) नागपूर.
४) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
५) वित्त विभाग, (व्यय-११)मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, विशेष प्रकल्प, मुंबई (सोबत अंदाजपत्रकाची प्रत)
७) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चेंबूर
८) कार्यकारी अभियंता, बहुमजली बांधकाम विभाग, कुर्ला
९) निवडनस्ती कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.